३७/प

20140725124522l708

सनदी परीक्षेमध्ये महाराष्ट्राचे प्रतिनिधीत्व वाढविण्यांच्या दृष्टीने करावयाच्या उपाययोजनेबाबत मार्गदर्शन करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत ...

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांकः आयएएस-२००५/ (४४५/०५)/ मशि-१.
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई, ४०० ०३२.
दिनांक : १८ एप्रिल, २००६.

**प्रस्तावना:-** "राष्ट्रीय स्तरावर भारतीय प्रशासकीय सेवा, भारतीय पोलिस सेवा व तत्सम विविध स्पर्धा परीक्षांमध्ये उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांमध्ये इतर राज्यांच्या तुलनेत या राज्यातील विद्यार्थ्यांचे अत्यल्प प्रमाण लक्षात घेता हे प्रमाण वाढविण्यासाठी व उमेदवारांची अद्ययावत पध्दतीने योग्य प्रकारे पूर्वतयार करुन घेण्यासाठी राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात किमान एक प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्याचे दृष्टीने आवश्यक ती उपाययोजना करावी" या आशयाचा अशासकीय ठराव दि. १५/७/२००५ रोजी श्री. सुधीर मुनगंटीवार व अन्य सदस्यांनी विधान सभेत मांडला होता. या ठरावावरिल चर्चेच्या दरम्यान मा. मंत्री , उच्च व तंत्र शिक्षण यांनी सनदी परीक्षेमध्ये महाराष्ट्राचे प्रतिनिधीत्व वाढविण्याच्या दृष्टीने करावयाच्या उपाययोजनेबाबत मार्गदर्शन करण्यासाठी काही सन्माननीय सदस्य व राज्यातील काही वरिष्ठ अधिकारी यांची एकत्रित समिती नेमण्याचे आश्वासन सभागृहात दिले होते. त्यानुसार अशी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

उपरोक्त पार्श्वभूमिवर सनदी परीक्षेमध्ये महाराष्ट्राचे प्रतिनिधीत्व वाढविण्याच्या दृष्टीने करावयाच्या उपाययोजनेबाबत मार्गदर्शन करण्यासाठी पुढील प्रमाणे समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. श्री. अरुण बोंगिरवार, | माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, | अध्यक्ष. |
| २. श्री. सुधीर मुनगंटीवार | वि.स.स. | अशासकीय सदस्य. |
| ३. श्री. तुकाराम बिरकड | वि.स.स. | अशासकीय सदस्य. |
| ४. श्री. सुभाष देसाई | वि.स.स. | अशासकीय सदस्य. |

169

| | | |
|---|---|---|
| ५. श्री. नितीन राऊत | वि.स.स. | अशासकीय सदस्य. |
| ६. श्रीमती फौजिया खान | वि.प.स. | अशासकीय सदस्य. |
| ७. श्री. अशोक मोडक | वि.प.स. | अशासकीय सदस्य. |
| ८. श्रीमती (डॉ.) जॉयस शंकरन | प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण. | सदस्य. |
| ९. श्री. संजय उबाळे. | सचिव, विशेष प्रकल्प, प्रशासकीय सुधारणा, र. व का. सा.प्र.वि. | सदस्य. |
| १०. श्री. संजय बर्वे. | पोलीस उप आयुक्त, पोलीस महा संचालक कार्यालय, मुंबई | सदस्य. |
| ११. श्रीमती (डॉ.) निशा पंडित | संचालिका, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई. | सदस्य. |
| १२. श्री. विजय कुलकर्णी | सह संचालक, मुंबई विभाग, मुंबई. | सदस्य सचिव |

२. समितीची कार्यकक्षा:-

१) नागरी सेवा पूर्व परिक्षा व मुख्य परिक्षा या मध्ये या राज्यातील विद्यार्थ्यांचे कमी असलेले प्रमाण लक्षात घेता हे प्रमाण वाढविण्यासाठी व उमेदवारांची अद्ययावत पध्दतीने योग्य प्रकारे पूर्व तयारी करुन घेण्यासाठी विविध उपाय योजना सुचविणे.

२) नागरी सेवा परिक्षेच्या पूर्व तयारीच्या प्रक्रीयेमध्ये राज्यातील मुक्त विद्यापीठे तसेच अन्य विद्यापीठांना सहभागी करून घेण्याच्या पर्यायाचा विचार करणे. (उदा. नागरी सेवा लेखी परिक्षेसाठी विषयांची निवड करण्याबाबत विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करणे, परिक्षेस बसणा- संबधीत विद्यार्थ्यांना विद्यापीठांच्या ग्रंथालयाचा वापर करण्याची सुविधा उपलब्ध करणे इ. )

३) राज्यामध्ये मुंबई,नागपूर, औरंगाबाद व कोल्हापूर या ४ ठिकाणी नागरी सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्रे सुरू करण्यात आली आहेत. सदर संस्थांची प्रवेश क्षमता प्रत्येकी ६० इतकी आहे. या केंद्रांमधील विद्यार्थ्यांच्या प्रवेश क्षमतेमध्ये वाढ करण्याच्या आवश्यकतेबाबत शिफारशी करणे.

४) राज्यातील मुंबई,नागपूर, औरंगाबाद व कोल्हापूर या ४ नागरी सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्राच्या पायाभूत व अन्य आवश्यक सोयी सुविधांचे बळकटीकरण करून सदर केंद्राचा जास्तीत जास्त उपयोग करण्याच्या दृष्टीने उपाय योजना सुचविणे.

५) राज्यातील प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेत प्रशिक्षण घेणा-या विद्यार्थ्यांना द्यावयाच्या सुविधांचा आढावा घेऊन सरसकट मोफत निवास व्यवस्था व रु. १०००/ निर्वाह भत्ता न देता प्रत्यक्षात गरजू विद्यार्थ्यांना (उदा. EBC) सदर सुविधा उपलब्ध करण्याच्या अनुषंगाने शिफारशी करणे.

३. सदर समिती तीन महिन्यात आपला अहवाल शासनास सादर करील.

४. समितीच्या सदस्यांच्या प्रवास व दैनिक भत्ता याबाबत स्वतंत्रपणे आदेश काढण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(स्वाक्षरी)
(भि. क. उसारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति

१. श्री. सुधीर मुनगंटीवार, वि.स.स., भाग्यश्री, गोल बाजार वार्ड, चंद्रपूर, ४४२ ४०२.
२. श्री. तुकाराम बिरकड, वि.स.स., मु. कुंभारी,पो. बाभुळगांव,(जहाँ), ता.जि. अकोला.
३. श्री. सुभाष देसाई, वि.स.स., १, विधुत, टिळक नगर, रोड नं. ४, महात्मा गांधी रोड, गोरेगांव, (प), मुंबई ४०० ०६२.
४. श्री. नितीन राऊत, वि.स.स., १६१-अ, अशोक नगर, नागपूर, जिल्हा नागपूर,
५. प्रा. फौजिया खान, वि.प.स., क्विन्स स्कूल, शिवाजी पार्कच्या समोर, परभणी, ४३१ ४०१.
६. डॉ. अशोक मोडक,वि.प.स., दातार सदन, पटेल रस्ता, डोंबिवली (पु) ४२१ २०१.
७. श्री. अरूण बोंगिरवार,अध्यक्ष, Tariff Authority for Major Ports, भांडार भवन, ४ था मजला, मुझावर पाखाडी मार्ग, माझगांव, मुंबई, ४०० ०१०
८. श्री. संजय उबाळे,सचिव, विशेष प्रकल्प, प्रशासकीय सुधारणा, र. र का. सा.प्र.वि.

१२१

९. श्री. संजय बर्वे, पोलीस उप आयुक्त, पोलीस महा संचालक कार्यालय, मुंबई.
१०.श्रीमती (डॉ.) निशा पंडित, संचालिका, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई.
११. श्री. विजय कुलकर्णी, सह संचालक, मुंबई विभाग, मुंबई.
१२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र, नागपूर.
१४. संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र, औरंगाबाद.
१५. संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा पूर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर.
१६. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक,
१७. सर्व उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. अवर सचिव (साशि-१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग / वित्त विभाग.
२०. निवड नस्ती.